# अंकुर अक्षरांचे...

## (भाग चौथा)

मनातल्या भावनांना अंकुर फुटावेत
अन त्या अंकुरांची अक्षरं उमटावीत..
अक्षरांचे श्वास होता होता
अंकुरल्या भावनांना पानं फुटावीत..
अंकुरपानावर उमटावी एक कळी प्रतिमेची
हुंकार भरता तिची असंख्य फुलं व्हावीत..
फुलारलेलं ओंजळीत एक रोपटं
अस्तित्वाची नवी जाणीव मिळावी..



# चौथ्या आवृत्तीची प्रस्तावना

रसिकहो॥ आपण वारंवार भेटलो ते या ई-पुस्तकांच्या माध्यमातून..
आम्ही केलेलं काम, आपण दिलेल्य रचना, एक नजर, एक जिगर असा हा प्रवास आहे. मायमराठीला एका वेगळ्या वाटेने वेगळ्या शिखरावर नेऊन ठेवण्याचा हा तिच्या लेकरांचा अविरत प्रयास, आपल्या साथीने आणि आशीर्वादाने सुरूच राहील.

यंदा ठरवलं आहे. अंक कसा बनला हे या पुस्तकात न सांगता ते पुढल्या, अर्थात या मालिकेच्या शेवटच्या अंकासाठी राखून ठेवायचं. हा अंक पाहताना जाणकार रसिकांना केलेले बदल आणि सुधारणा नक्कीच लक्षात येतील.

अंक कसा वाटला ते जरूर कळवा.

संहिता हिस्वनकर
Samhita.hiswankar@gmail.com

# रसग्राहिकेचा परिचय:



रंजन कंधारकर यांची खरी ओळख म्हणजे कविताच. त्यांच्या स्वतंत्र शैलीतील कवितांना आजवर अनेक चाहते लाभले आहेत. त्यांच्या अनेक कविता आजवर विविध वृत्तपत्रे, दिवाळीअंक तसेच नियतकालिकांमधून प्रकाशित झालेल्या आहेत. त्यांचा "स्वधा" हा काव्यसंग्रह प्रकाशीत झाला असून त्याला महाराष्ट्र राज्य शासनाच्या "बहिणाबाई चौधरी" पुरस्कारासहित तब्बल २१ पुरस्कार प्राप्त आहेत.

कविवर्य लक्ष्मीकांत तांबोळी यांच्या "गोकुळवाटा" या काव्यसंग्रहातिल कवितांच्या अभिवाचनात त्यांचा सहभाग असतो. याशिवायही महाराष्ट्र व गोमांतकात अनेक ठिकाणी त्यांचे काव्यवाचनाचे कार्यक्रम होतात. 'आनंदयात्रा' या बा.भ. बोरकरांच्या व 'रसयात्रा' या कुसुमाग्रजांच्या काव्यवाचन समारंभात त्या सहभागी असतात.

आकाशवाणीवरील कविसंमेलने, पथनाट्य वाचन, मुलाखत इत्यादी कार्यक्रमांत त्या सहभागी होतात. याशिवाय शालेय-महाविद्यालयीन कथा व काव्यलेखन स्पर्धांमध्ये अनेक वेळा त्या परिक्षक म्हणून काम पाहतात.

रंजनताई सध्या 'मधुगंध' काव्यमंडळाच्या कोषाध्यक्षा तसेच 'अक्षरसूक्त' काव्यमंडळाच्या सचिव म्हणून पदभार सांभाळतात. आपल्या शब्दांतून आणि मार्गदर्शनातून त्यांची साहित्यसेवा अविरत सुरू असते. त्यांचा "भूर्जपत्र" हा आगामी काव्यसंग्रह लवकरच आपल्याला पहायला मिळेल.

## रसग्राहिकेचे मनोगत:

अंकुर अक्षरांचे मालिकेतील अक्षरांचे धनी असलेल्या सर्वांचं अभिनंदन !!

~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

अंकुरण हा सृष्टीचा नियम आहे. मग ते पाना पानांचं अंकुरणं असो वा मना मनाच! पानाचं अंकुरण जमिनीशी नातं ठेऊन असत तर मनाचं भावनेशी !!

असे फुटवे "अंकुर अक्षरांचे" या मालिकेत आपल्याच मस्तीत उगवतांना दिसतात. काही कोवळे, काही गार हिरवे, काही परिपक्व तर काही सुकलेलेही . कवितेच्या रुपात येणारे हे अंकुर एकंदरीतच मनाला हिरवं करुन जातात. यातली काही ठिकाण तर केवळ पाचूची आहेत. सती, रुद्रविणा, पाउलवाट, माफीनामा, एकरूप, बिंदू, जन्म कवितेचा, मन, वसंत ऋतू अशी काही नावं नमुन्या दाखल देता येतील. या ठिकाणी मन रमलं नाही तरच नवल.

काही नाजूक वेलींना मात्र अजुन जराश्या आधाराची गरज वाटते .भारंभार वाढलेली शब्दांची पानं ह्या वेलींना उपजत जड करतात. आणि मग हिरवाईचा तोल गेलेला दिसतो. नीटस, नेमकी शब्दरचना; रचना करता करता पूर्ण कवितेलाच दिलेला सुबक आकार, त्याच त्या अर्थाची कडवी करुन बांडगुळ निर्माण करण्याचा टाळलेला मोह या अगदी छोट्या छोट्या गोष्टी कवितेला उंची देण्याच काम करतात. जसं पिवळी पानं, सुकलेल्या फांद्या, शिळी फुलं, आजू बाजूला वाढलेलं तण ह्या गोष्टी काढून टाकल्या की झाड अधिकच मोह घालत, बस! तसच !!

अंकुर अक्षरांचे मालिकेतील या कविता रूपातील अंकुरांचा हा महोत्सव मनापासून मनापर्यंत सेतू बांधण्याचे काम मन:पूर्वक करत आलेला दिसत. अंकुरण्याची त्यांची धून विलक्षण आहे. ही धून, धुनी सारखी चिरकाल तेवत रहो. ही सदिच्छा !!

संबंधित सर्वांचे आभार !

रंजन .....आतून !!
~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

महोत्सव हा नवा मोहिनीचाच शब्द आहे. अक्षरांना अंकुरणारं आकाश असेल तर महोत्सव चंद्र पावतो. कवींचं आकाश चंद्राचं; कवींचं आणि पुन्हा पुनवेचंही. म्हणून महोत्सव आकाश आणि मातीच्या चुंबनाचा चंद्रोत्सवही असतो. 'अक्षर अंकुर महोत्सव २०१९' या उपक्रमात त्याची क्रमिकताही आहेच. मुख्य म्हणजे महोत्सवातही उत्कटता.

'अंकुर अक्षरांचे' ही पुस्तक मालिका त्याची म्हणजे महोत्सवाची ई-आवृत्ती आहे. 'ई' हा 'आ'चा प्रत्यय आला की 'आई' न 'आकाश आणि 'ईश्वर' हा शब्दांनाही अर्थ पावतो. मराठी कविता संचालक मंडळाने अक्षरांना अंकुरित करण्याचा आत्मविश्वास देणे हेच मालिकेचं मोल आहे!

M. H. [illegible]



# रुद्रवीणा

खंत नाही, खेद नाही, धावणे मंजूर आहे
वाट काट्यांची जरी ही, आणि थांबा दूर आहे

आंधळ्या कोशिंबिरीचा डाव त्याने मांडलेला
आखल्या त्यानेच कक्षा, त्यांत जो तो बांधलेला
छेदणे त्या वर्तुळाला त्यास नामंजूर आहे

पापपुण्याचा पसारा तोलती अदृश्य बाहू
हो मना वेळीच जागा, तू नको गाफील राहू
मीपणाचा स्वैर वारू उधळतो चौखूर आहे!

भव्य विश्वाचा पसारा सावरी जो एकहाती,
जाणतो कोठे कुणाची द्यायची जोडून नाती
सोपवू त्यालाच सारे, का मनी काहूर आहे?

जीवनाची रुद्रवीणा, जुळविल्या त्यानेच तारा
छेडणे कर्तव्य माझे, जाणुनी त्याचा इशारा
ताल-लय वरदान त्याचे अन् कृपेचा सूर आहे

क्रांति साडेकर
krantisadekar@gmail.com

# शास्त्रार्थ सारे

शास्त्रार्थ सारे कोळून प्यालो
सत्य जाणिले अंताचे..
अश्रुंच्या या धारेस तरीही
अर्थ कळेना शब्दांचे..
कातर मन बालक होई
बोट सुटता हातीचे..
आशीर्वचने असतील सदैव
नसतील हात मातीचे..
काठी होवूनी चालता कधी
निखळले भान साथीचे
निरोपाची घटिका भरीता
अंतरी काहूर मणामणांचे...
जिथे तिथे हिच पावले
ध्वज मिरवता संसाराचे

स्वाती फडणीस
phadnissvp@gmail.com





# !! दिशा !!

प्रत्येकाला अस का वाटत
नक्कीच कुठे तरी अडतय,
कोणतेही कारण नसताना
माझ्याच बाबतीत हे का घडतंय.
काहीच चूक नसताना
आपण स्वत:हून हरायचं,
समोरच्याने मात्र मीच बरोबर
अस सांगत सगळीकडे फिरायचं.
मला मान्य आहे जरा अवघड असत
तरीही 'नाही' म्हणण शिकायला हव,
आयुष्याकडे परत एकदा
आपण नव्याने पाहायला हव !!!!

"या विश्वात माझी किमंत
फक्त एक टिंब आहे
पण इथे प्रत्येकाच्या मनात
माझ एक प्रतिबिंब आहे. "

शिवदास अष्टेकर उर्फ कल्पिकी
shivdas.ashtekar@gmail.com

# त्या दिवशी माझ फ्रेंड



त्या दिवशी माझ फ्रेंड
रडत रडत आला
माझा बाबा बाप्पाकडे गेला
म्हणत गच्च मला बिलगला
मीही हादरलो क्षणभर
अन सावरलोही एका क्षणात
असा कसा बाप्पा करेल म्हणत
हसलोही जरा मनात
समजावलं त्यालाही असं नाही बाप्पा करणार
गम्मत केली असेल तुझी
उद्या तुझा बाबा तुला नक्कि परत करणार
दिवस सरले
आठवणी विरल्या
माझ्या लहानश्या जगात
आता माझा बाबाच माझा सर्वस्व झाला
.
.

आज मात्र कोण जाणे
बाबा अजुन आला नाही
खाउ आणण्याचं प्रोमिस
तो विसरणार तर नाही
दार वाजतय जोरात
बहुदा बाबा आला
घाबरलेल्या अरे ह्यातर
शेजारच्या काकु आल्या
रेल्वेमध्ये म्हणे कोणी मोठा बोम्ब ठेवला
त्या बोम्ब्सोबतच बाबा माझा बाप्पाकडे गेला
अश्या कशा ह्या काकु खोटं बोलताहेत
ताइपण वेडी माझी ओक्सबोक्षी रडतेय
कळत कसं नाही ह्यांना तो का असं करील
बाप्पाचा बाबा असताना तो माझा का नेईल
आईच्या कुशित शिरल्यावर मात्र सगळं काहि कळलं
त्यादिवशीचं दोस्ताचं रडणं मग उगाचच आठवलं
खरच् वर बसलेला हा बाप्पा
कधी कधी गंमत नसतो करत
एकदा घेउन गेला ना
कि बाप्पा बाबा परत नसतो करत

रुचिरा कुलकर्णी
ruchirakulkarni1@gmail.com



# तसे फार नाही,

तसे फ़ार नाही , तरी दुःख सलते
पुन्हा पापण्याशी जरा ओल येते

किती दाटले मेघ येथे तरीही
झरेना कुठे थेंब ना अन सरीही
ऋतू कोणता हे मलाही न कळते
कधी पापण्याशी जरा ओल येते

उगा हासते ही, व्यथा अंतरीची
कशी वेदना पेट घेते मनीची
मुखी हास्य हुकुमी, प्रयत्नी विलसते
तरी पापण्याशी जरा ओल येते

क्षणांचे इशारे, कधी ना समजले
हळूवार हातातुनी क्षण निसटले
तसे फ़ार नाही, पहा.. मीच म्हणते
कुठे पापण्याशी जरा ओल येते?

- प्राजक्ता पटवर्धन
praaju.patwardhan@gmail.com

# बाकी याची शून्य नाही

उद्यामध्ये डोकावतां जेव्हा पाहतो वळून
किती काळ संपला ती मिती येतसे कळून
विशी-चाळीशी-पासस्टी असे टप्पे मागे गेले
जशी हातातून वाळू जाते भुळभूळ गळून
हे ना सिंहावलोकन, बस् थोडासा मागोवा
किती, कुठे धावलो नी केला कशाचा मी ठेवा
कुणा जोडले, तोडले कुणा, कुणा दुखावले?
जमा-वजा-बाकी ताळा आता येतसे जुळून
उद्या-परवा-तेरवा जेव्हा नसेन मी इथे
कुणी तपासाल माझ्या प्राक्तनातली लिखिते
ताळेबंद आयुष्याचा कुणी मांडून बसाल
बाकी याची शून्य नाही असे येईल कळून
आला रिकाम्या हातानी आणि रिकामा हा गेला
असे म्हणायला जागा ठेवणार ना तुम्हाला
कोपऱ्याशी पापणीच्या आसू झरताना एक
"प्रेम घेऊन गेला हा" तुम्हा येईल कळून





मुकुंद सं. कर्णिक
karnik.mukund@gmail.com

# तु शिवकल्याण राजा !!!

ग्रहण सूर्यास लागे
पापभारे धरती डोले
अंधःकार घनघोर
पसरे पारतंत्र्याचा ||

रयत दीन बिचारी
त्राही त्राही होई
जुलमी फौजा शाही
लुटती दिशा दाही ||

मंदिरात देव नाही
वावरात माणूस नाही
आक्रोशे काळी आई
वैभवास वारस नाही ||

गोमाता भयभीत
गृहलक्ष्मी चिंताक्रांत
घरधनी जाई रणी
रक्षिण्या तीज न कुणी ||

अधर्म असा भयंकर
माजला हाहाःकार
म्लेंच्छास निर्दाळण्यास
अवतरी तारणहार ||

म्लेंच्छास त्या मारीन
स्वराज्यास स्थापीन
शपथ घेसी तु
रायरेश्वरा स्मरुन ||



ती नजर तुझी करारी
फिरे सह्याद्रीवरी
आतुर लावण्या भगवा
गडकोट किल्ल्यांवरी ||

रणशिंग करी नाद
भगवा डोले गगनात
करी पराक्रमाची शर्थ
रणांगणी झुंझण्यात ||

बादशाही थरारे
सिद्धी, गोरे नमले
जिंजीचेही राज्य जिंकीले
ध्वज स्वराज्याचा डोले ||

छत्र धरे मस्तकी
वरदान भवानीचे हाती
स्वातंत्र्याचा गोंधळी
आईचा पोत नाचवी ||

लेकी, सुना सुखावती
मातीतुन पिकती मोती
सुखाची वर्षा करी
गगन मस्तकावरी ||

धन्य होई जिजामाता
सुखावे सारी प्रजा
सह्यगिरी हर्षित
तु शिवकल्याण राजा

मनिशा भिडे
manishasni@gmail.com

# बिंदू

क्षणात फुलतं
ओठांवर एक
कुत्सित हास्य ....
आणि उगारले जातात
विखारी शब्दांचे भाले
रोखून पाहणाऱ्या डोळ्यांमधे
दिसते अघोरी चमक
एक असहाय्य सावज
कोंडीत पकडल्याच्या उन्मादाने
लखलखणारी

स्वतःचं 'मी' पण सुखाउन
शांत झालेलं त्यांचं मन
मश्गुल होतं .....यशाच्या धुंदीत
------- आणि माझ्या मनात
उमलत असतो ..रसरसलेला
एक बिंदू .... तिरस्काराचा !

या आत्ममग्नांच्या कळपात राहूनही
मनावर तरंगत असते
एकच जाणीव
" मला जायलाच हवं .."

कुठे? -- कसं?
काहीच माहिती नसतं
पण ...
जाणं -- जरुरी असतं




हा उंबरठा ओलांडल्या शिवाय
तिरस्काराचा तो 'बिंदू'
पुसला जाणं अवघड असतं

म्हणून जीवाच्या कराराने
पाउल उचलते ..
बंद असलेल्या दारावर
हात ठेवते ..
आणि लक्षात येतं ....
दरवाजा बंद नाहीये !

इतका वेळ उगीचच
त्याच्या भितीने
अडकून राहिले मी इथे

--- मनावर साचलेली जळमटे
क्षणात झटकली जातात
आणि बघता बघता
तिरस्काराचा तो बिंदू
दिसेनासा होतो ...

चैतन्याच्या तेजस्वी प्रवाहात

मनिशा भिडे
manishasni@gmail.com

# जन्म कवितेचा....



जेव्हा कुठेतरी अंधाऱ्या खोलीच्या गर्भात..
आकंठ दारिद्र्यात उपाशी पोटाची माय..
काळजाच्याही पुढच्या काळजीने..
हळुवारपणे आपल्या गर्भात वाढवलेल्या एका गोंडस जीवाला
जन्म दिल्याचा आनंद भोगत असते....
जेव्हा कुठेतरी केवळ प्रारब्धाच्या क्षुल्लक हालचालीने,
नाकर्तेपणाचा डाग लागलेला मेहनती बाप,
निमित्त म्हणून दान धर्माच्या नावाखाली..
स्वतःचे रक्त विकून येणाऱ्या पैशात..
चार दिवस उपवास काढणाऱ्या लेकराची दिवाळी साजरी करत असतो....
जेव्हा हलाखी अन् उपवास काढून,
प्रसंगी स्वतःला ह्या ना त्या प्रकारे विकून वाढवलेल्या लेकराच्याच..
पुन्हा 'नवीन' सुखासाठी आईबाप..
स्वतःचा जीव आनंदाने वृद्धाश्रमात घालवत असतात....
जेव्हा कुण्या एका गावात ..
कातरवेळच्या शीतल वातावरणात..
हळुवार अनुभवलेल्या दोन सोबतीच्या घटकांचा...
मनात विचार येताच...
फसवणूकीच्या निखाऱ्याची धग लागून..
एखादा प्रियकर किंवा एखाद्या प्रेयसीच्या अंगात ज्वर वाढत जातो...
जेव्हा काजव्यांची पिलावळ..
अंगभूत प्रकाशाच्या वरदानाने..
मार्गस्थाला दिशा दाखवण्याचा प्रयत्न करत असताना..
स्वच्छ प्रकाश देणाऱ्या दिव्यांच्या वस्तीत मात्र..
जाणून बुजून अंधार करून...
मार्गस्थाला भटकावण्याचं सामाजिक पाप,
समाजाकडूनच घडत असतं...

जेव्हा मानसिक आणि शारिरीक गुंतागुंतीच्याही पुढे जाऊन...
नियती निर्देशीत भावनांच्या एकटेपणाच्या...
प्रसववेदनांतून .. आपसूकच हुंकार फुटत जातो...
...

तेव्हा जन्म होतो.... माझ्या कवितेचा....

सचिन पावसकर
skpawaskar@gmail.com




# वृक्ष

संस्कृतिच्या आधारवडासम एक पुरातन वृक्ष
विकृतिच्या संसर्गे होई डळमळीत नी रुक्ष

जोम, पालवी निव्वळ उरल्या गतकालातिल कथा
कुणा तमा ना फिकिर कशाची हीच तरूची व्यथा

पारंब्या आधार न देता मुळावरी उठती
कैक ठिकाणी बुंधा, फांद्या भुंगे पोखरती

शेंड्यावरची पाने करिती शोषण सर्व रसाचे
उरल्या थेंबांवरी कुपोषण हो बाकीच्यांचे

विषवल्लीने त्यास वेढिले घालुनी विळखा घट्ट
आणि तरूच्या नसां शिरांतुन गरळ झिरपते भ्रष्ट

घटका घटका विघटन ग्रासे घटकच घातक होती
अंतरस्थ प्रदूषण अती माजले कुणा न त्याची क्षिती

वसुंधरेचा सुपुत्र म्हणुनी आजवरी तगला
तग धरण्यास्तव तगमग त्याची बघवेना तिजला

घट्ट धरूनी मुळांस त्याच्या धरणी आक्रंदते
वृक्षाच्या पुनरुत्थानाचे आवाहन ती करते

..... उल्हास भिडे
ulhasbhide@gmail.com

# निवडुंग

चुकून फुटलेल्या पालवीचा विपर्यास
आश्वासक वाटला तिचा स्पर्श त्याला सुद्धा

वड बनण्याच्या नादात विसरून गेला स्वतःचाच गुणधर्म
रक्ताळलेली काटेरी किनार गेली आरपार छेदत

भेदरलेली ती मात्र स्वतःलाच दोष देत
उगाच दूर आकाशात शोधत नसलेल्या तिच्या चुका

तो हतबल पुन्हा एकदा
अंगावर काटे घेऊन जगतोय

नवीन पालवीच्या शोधात
एकाकी निवडुंग



संदेश बागवे
Bagave.sandesh@gmail.com

# संकल्प

सीमेवरून येतात रोज धमक्या
आज मुंबई, उद्या दिल्ली उडवून देऊ
आपण मात्र त्यांच्या स्वागतासाठी
समझौता EXPRESS सीमेपलीकडे नेऊ

सांगा मी या फुकटखाऊंना का निवडून देऊ?

आपल्याच देशात दहशतवाद्यांकडून
वारंवार शहीद आपण होऊ
सरकार मात्र -कसाब° सारख्यांना
एकाच ताटात फुकट घालतंय जेऊ

सांगा मी या फुकटखाऊंना का निवडून देऊ?

बटाटा गेला चाळीसवर
शंभरावर जाईल गहू
भ्रष्टाचाराची भूक आमची
फक्त जनतेचाच पैसा खाऊ

सांगा मी या फुकटखाऊंना का निवडून देऊ?



मोठ्यामोठ्या योजनांच्या नावाखाली
टेबलाखालून पैसे न विसरता घेऊ
जनतेला मात्र छोट्या छोट्या कामासाठी
दिवसेंदिवस ताटकळत उभे ठेऊ

सांगा मी या फुकटखाऊंना का निवडून देऊ?

LOAD SHEDDING, पाणी कपात
जनतेला आम्ही असेच चावू
आणि आमच्या वीज व पाण्याचे "BILL"
निर्लज्जपणे जनतेवरच लावू

सांगा मी या फुकटखाऊंना का निवडून देऊ?

प्रमोद शिंगोटे
Pramod.Shingote@petrofac.com



# संपला स्नेह सारा

संपला स्नेह सारा सारे बंध तुटले होते
घर वाळूचे माझे वाळूतच रुतले होते

बोलावित होती परत मजला वेस माझ्या गावाची
मी चित्र माझ्या गावचे अश्रूत भिजवले होते

का नेहमीच केली मी, आर्जवे प्रेमाची
स्वप्नील दुनियेचे ते एक मृगजळच होते

अबोध मनाची अबोल साद घातली जेव्हा
बहिरे जग हे मज वेडवित होते

जवळ आलि घटिका जेव्हा माझ्या निर्वाणाची
दोन थेंब अश्रूंचे, डोईवर मज कर्ज होते

समीर दळवी
sam_918@yahoo.com

# आरती भेळेची

सुखकर्ता दुखहर्ता वार्ता भेळेची
नुरवी पुरवी प्रेम शेव फरसाणाची
सर्वांगी सुंदर बशी चुरमुऱ्याची
कंठी ठसके माळ हिरव्या मिरच्यांची

जय भेळ जय भेळ, जय चंगळ पुर्ती
दर्शनमात्रे न हो, स्मरणेमात्रे न हो कामनापूर्ती
जय भेळ जय भेळ

चिंचखजुर गुळ तव जिव्हे प्यारा
फरसाण अन गाठी उत्तम तोबरा
शेवजडित मुगुट शोभतो बरा
चुरचुरती चुरमुले चटणी घालुनिया

जय भेळ जय भेळ, जय चंगळ पुर्ती
दर्शनमात्रे न हो, स्मरणेमात्रे न हो कामनापूर्ती
जय भेळ जय भेळ

लिंबूवर कोथिंबिर आणि वर कांदा हा
सरळ पुट्ठा वक्र होई खाताना
दास भेळेचे वाट पाहे सदना
शेंगदाणे घालावे, वर चाट प्रोक्षावे भरभर खाताना
जय भेळ जय भेळ, जय चंगळ पुर्ती
दर्शनमात्रे न हो, स्मरणेमात्रे न हो कामनापूर्ती
जय भेळ जय भेळ



सचिन भिडे
sachinab@gmail.com



# सावली

झाड म्हणाले पडता पडता
आमची कोठे शाखा नाही
सावली फक्त इथेच होती
दुसरीकडे मिळणार नाही

तुमचे घाव घेतानाही
मान वर करून होतो
तुमच्या वाटचे चटके खात
सावली वर धरून होतो

घातलात अंतिम घाव जेव्हा
सूर्यही वरून हसला
बरे झाले सावली मेली
आता खरा माणूस फसला

उन्हामधे थकत भागत
बसा आता सावली शोधत
झाडे पुन्हा लावण्यासाठी
बसा आता खड्डे खोदत

अतुल घाटे
atuldghate@gmail.com

ई-पुस्तकाचे नाव: अंकुर अक्षरांचे (भाग चौथा)

संकल्पना: "मराठी कविता" संचालक

मांडणी व सजावट: संहिता हिस्वनकर

रसग्रहण : रंजन कंधारकर

प्रकाशन: ई-साहित्य प्रतिष्ठान



संपर्क

ईमेल akshar.ankurmk@gmail.com, esahity@gmail.com

वेबसाईट http://www.esahity.com/

फेसबुक http://www.facebook.com/groups/kavya.marathi